**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील प्रमुख जिल्हामार्ग/राज्य महामार्गाच्या हद्दीपासून विहित अंतरावर समांतर अथवा छेदून सेवा वाहिनी टाकण्यासंदर्भात परवानगी देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२४६/रस्ते-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३० मे, २०१७.

<u>वाचा:-</u>१) शासन निर्णय,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक :मेइम २०१५/प्र.क्र.१०५/उद्योग-८, दिनांक ११.२.२०१६

**<u>प्रस्तावना:-</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीत असलेल्या प्रमुख जिल्हा मार्ग व राज्य महामार्गाच्या हद्दी लगत अथवा छेद करून बऱ्याचदा निरनिराळ्या संस्थांना विविध सेवा वाहिन्या टाकण्याची गरज असते. असे काम रस्त्याच्या बाजूला, गटारी खोदून अथवा रस्त्याचा भराव/ शोल्डरमध्ये तसेच रस्त्याच्या रूंदीमध्ये खोदकाम करून या सेवा वाहिन्या टाकण्यात येतात. बऱ्याच ठिकाणी पाणीपुरवठयासाठीही रस्ता खोदून पाईप्स अथवा केबल्स टाकण्यात येतात. यामुळे रस्त्याचे मोठया प्रमाणात नुकसान होते. आता Micro Tunneling/ आडवे बोअरिंग सारखे नवनवीन तंत्रज्ञान उपलब्ध झाले आहे. त्यामुळे रस्त्याचा भराव जे.सी.बी. सारख्या यंत्राने रस्ता खोदण्याऐवजी Micro Tunneling /रस्त्याखालील आडवे बोअरिंगचा वापर केल्यास रस्त्याचा पृष्ठभाग तसाच ठेवला जातो. अशा Micro Tunneling /आडवे बोअरिंग मुळे रस्त्यावरील वाहतूकीस अडथळा न येता अथवा रस्त्याला हानी न करता सेवा वाहिनी टाकण्याचे काम पूर्ण करता येऊ शकते. यामुळे रस्त्यावरील वाहतूक विनासायास सुरू राहते तसेच, रस्त्यांच्या पृष्ठ भागास हानी पोहोचत नाही.

उपलब्ध सर्व तंत्रज्ञानाचा विचार करून D.I.P.P (Ease of doing business assessment) या खाली केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे सर्व गोष्टींचा साकल्याने विचार करून खालील सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

**शासन निर्णय:-**

(१) ज्या ठिकाणी रस्त्याचा पृष्ठभाग व भराव यांना हानी न पोहोचवता Micro Tunneling/ आडवे बोअरिंग पध्दतीने रस्त्याच्या बाजूने अथवा Micro Tunneling /आडवे बोअरिंग पध्दतीने छेद देऊन, सेवा वाहिनी अथवा अन्य बाबी टाकण्याचे काम करणे शक्य असेल, तर अशा ठिकाणी प्रजिमा/राज्यमहामार्ग /प्रमुख राज्यमार्ग यावर हे काम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या हद्दी लगत करण्यात यावे. यामुळे रस्त्यास हानी पोहोचणार नाही, याची दक्षता घ्यावी. यासंबंधीचा अर्ज कार्यकारी अभियंता यांचेकडे केल्यानंतर सात दिवसांचे आत परवानगी देण्याविषयक निर्णय घेऊन, तो कळविण्यात येईल. सात दिवसांचे आत निर्णय न मिळाल्यास व संबंधित प्रकरण अधीक्षक अभियंता यांचेकडे वर्ग होईल. अधीक्षक अभियंता त्रृटींची पूर्तता करवून घेऊन, ७ दिवसांचे परवानगी विषयक होकार /नकारात्मक निर्णय कारणांसह कळवतील. निर्णय न कळविल्यास मानीव परवानगी (Deemed Permission) संगणक प्रणालीव्दारे निर्गमित होईल.

(२) ज्या ठिकाणी प्र.जि.मा. /रा.मा./प्र.रा.मा.यांचे हद्दीपासून विहित नियमानुसार सोडावयाचे किमान अंतर सोडून, जर रस्त्यासमांतर अथवा रस्ता ओलांडून विजेच्या उच्च दाबाची वीज वाहन करणाऱ्या तारांची जोडणी करण्यात येत असेल, तर अशा H.T. Transmission line साठी मैत्री पोर्टलवर ऑनलाईन

अर्ज उपलब्ध आहेत. यासाठी केंद्र शासनाच्या भूतल परिवहन विभागाने (MORTH) यांनी निर्धारित केलेल्या किमान १२.३० मीटर इतक्या उंचीवरून (Vertical Clearance) या उच्च दाबाच्या ट्रान्समिशन लाईन्स नेण्यात येतील, याची दक्षता संबंधित अभिकरणाने घ्यावयाची आहे. रस्ता ओलांडताना उच्च दाबाच्या तारांमुळे भविष्यात काही हानी झाल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित अभिकरणाची, उद्योगाची राहिल. यासाठी ऑनलाईन अर्ज केल्यास संबंधीत कार्यकारी अभियंता ७ दिवसाचे आत त्यांचा निर्णय ऑनलाईन स्वरूपात कळवतील. निर्णय न कळविल्यास मानीव परवानगी (Deemed Permission) संगणक प्रणालीव्दारे निर्गमित होईल.

(३) i) रस्ता खोदून रस्त्याला काटछेद देऊन विद्युत/अन्य केबल/सेवा वाहिनी टाकणे आवश्यक असल्यास, अशा ठिकाणी मैत्री पोर्टलवर व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकेत स्थळ www.maharashtra.gov.in येथे e- Permission नावाने लिंक उपलब्ध केलेली आहे. या परवानग्या ऑनलाईन संगणक प्रणाली मिळवण्यासाठी ऑनलाईन अर्जासाठी लिंक उपलब्ध करण्यात आली आहे. या व्यतिरिक्त अन्य सर्व परवानग्यांसाठीचे आवश्यक ते अर्ज मैत्री या पोर्टलवरून सादर करण्यात येतील व यासाठी आवश्यक त्या सर्व परवानगी, योग्य माहिती सादर केल्यावर रस्त्याचा पृष्ठभाग सुस्थितीत आणावयाची हमी संबंधित अभिकरणाने दिल्यास तसेच, त्यासाठी आवश्यक त्या रकमेचे भुगतान ऑनलाईन करण्यात यावे. संबंधित अर्जासोबत अशा सर्व आवश्यक त्या ऑनलाईन परवानग्या संदर्भात होकारात्मक /नकारात्मक निर्णय ७ दिवसाचे आत अभिकरणास देणे, नियंत्रक कार्यकारी अभियंता यांना बंधनकारक राहिल.

याबाबतीत सर्वसाधारणपणे खालील कालमर्यादा अधोरेखीत केलेल्या आहेत. अर्जदाराकडून ऑनलाईन स्वारस्य अर्ज प्राप्त झाल्यानंतर संबंधित अधीक्षक अभियंता यांनी दोन शासकिय कामकाजाचे दिवसता रस्त्याच्या कार्यक्षेत्रात कार्यकारी अभियंता यांना ऑनलाईन पाठवावे. कार्यकारी अभियंता यांनी दोन शासकीय कामकाजाचे दिवसात प्रतिनिधी, अर्जदार अथवा त्यांचा प्रतिनिधी समवेत संयुक्त पाहणी पूर्ण करतील. संयुक्त पहाणीच्या दिवशी अर्ज स्वाक्षरीसह अर्जदारास द्यावा. अर्जदाराने अर्ज भरल्यानंतर अर्जदाराच्या विकल्पानूसार शासकीय कामकाजाच्या एक दिवसात कार्यकारी अभियंता/किंवा त्यांचे प्रतिनिधी यांनी एकूण शुल्काची माहिती अर्जदारास ऑनलाईन द्यावी. त्यानुसार अर्जदाराने ऑनलाईन शुल्क भरल्यानंतर कार्यकारी अभियंता यांनी २ शासकिय कामकाजाच्या दिवसात प्राधिकाऱ्यांकडून ऑनलाईन मंजूरी प्राप्त करावी. e-permission चे परवानगी पत्र त्याच दिवशी ऑनलाईन द्यावे.

शुल्काची रक्कम ऑनलाईन स्वरूपात व २५ टक्के अंदाजित खर्चापेक्षा जास्त रकमेची भरणा करून घेण्यात यावी. जेणेकरून अर्जदाराने रस्ता सुस्थितीत न केल्यास कार्यकारी अभियंतांनी आपल्या स्तरावरून कार्यवाही करून रस्ता सुस्थितीत आणता येईल. संबंधित अभिकरणाने त्यांचे कामे परवानगी मिळाल्यांनतर १५ दिवसाच्या आत पूर्ण करावे. पुढील ७ दिवसाच्या कालावधीत रस्ता सुस्थितीत आणावा. रस्ता सुस्थितीत आणल्यानंतर संबंधित अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता यांच्या संयुक्त पाहणी नंतर भरणा केलेले शुल्क संबंधित अभिकरणास ऑनलाईन परत करता येईल.

संबंधित अभिकरणास अशा परवानगी ७ दिवसाचे आत न मिळाल्यास, अर्जामध्ये अधीक्षक अभियंता यांचकडे ऑनलाईन प्रकरण वर्ग होईल व संबंधित अधीक्षक अभियंता त्याप्रमाणे तातडीने पडताळणी करून अभिकरणास त्यांच्या त्रृटी कळवून पूर्तता करून घेतील व ७ दिवसांच्या आत अशी परवानगी देण्याबाबत निर्णय कळवतील. याप्रमाणे एकूण १५ दिवसांच्या कालावधीत

परवानगीबाबत लिखित निर्णय, परवानगी न देण्याबाबतच्या कारणांसह कळविणे, कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता यांना बंधनकारक राहील.

ii) रस्त्यावरील पुलाच्या खालून सेवा वाहिन्या नेण्यात येत असल्यास, पुलास कोणत्याही प्रकारे धोका पोहोचणार नाही, याची दक्षता संबंधित प्राधिकरणाने घ्यावी. या संबंधित अभिकरणाचा अर्ज ऑनलाईन प्राप्त झाल्यावर, संबंधित कार्यकारी अभियंता यांनी ७ दिवसात परवानगी देणे /नाकारणे बंधनकारक राहिल. कार्यकारी अभियंता यांनी निर्णय न कळविल्यास, अधीक्षक अभियंत्यांकडे प्रकरण ऑनलाईन वर्ग होईल. अधीक्षक अभियंता हे या बाबीवर ७ दिवसांचे आत निर्णय घेतील व तो संबंधित अभिकरणास ऑन लाईन कळवतील. याप्रमाणे एकूण १५ दिवसांच्या कालावधीत निर्णय न कळविल्यास मानीव परवानगी (Deemed Permission) संगणक प्रणालीव्दारे निर्गमित होईल.

iii) मैत्री पोर्टल वर उपलब्ध असलेल्या या ऑनलाईन अर्जाची लिंक स्वत:च्या कार्यालयीन संगणकावर mahapwd.com वर उपलब्ध करून घ्यावी व Ease of doing business या देशाच्या महत्वाकांक्षी कार्यक्रमास आपले योगदान द्यावे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०५३०१३२०५८४०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb818845016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.05.30 13:27:59 +05'30'

**( प्रकाश इंगोले )**
उप सचिव

**प्रति,**

१) मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
४) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन विभाग.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, दुसरा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय,मुंबई.
६) सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग (विद्युतसह).
७) संचालक, उद्याने व उपवने, मुंबई.
८) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युतसह).
९) अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
१०) कार्यासन (निवडनस्ती).